<u>आर्थिक वर्ष २०२२-२३ -पुनर्विनियोजन</u>
**मागणी क्र.डब्ल्यू-३- मुख्य लेखाशिर्ष- २२०३, तंत्रशिक्षण**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: तंपुन-३९२३/प्र.क्र.६७/२३/तांशि-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक: २८ मार्च, २०२३.**

**वाचा:-**
१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२.
२. संचालक,तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.९(३)/नियोजन/पुनर्वि.नि./२०२२-२३/१०१, दि.१३/०३/२०२३.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६/०३/२०२३.

**<u>शासन ज्ञापन:-</u>** "मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष- २२०३, तंत्रशिक्षण" याखाली सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये रु.८,३९,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी एकोणचाळीस लक्ष फक्त) इतक्या रकमेचे पुनर्विनियोजन करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध होणारा रु.८३९.०० लक्ष इतका ज्यादा निधी हा "डॉ.पंजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजना -२२०३ ३५४२, ३४-शिष्यवृत्त्या/विद्यावेतने" या उद्दिष्टाकरीता वितरीत व आहंरित करण्यास देखील याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

३. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२२/१४७१, दि.१७/०३/२०२३ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३५२/२०२३/व्यय-५, दि.२३/०३/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा सांकेतांक २०२३०३२८१८२३५५२५०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: CN = MANALI MILIND SAMANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.03.28 18:29:10 +05'30'

**(मनाली सामंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
३) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
६) वित्त विभाग/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती/तांशि-३.

**शासन ज्ञापन क्रमांक: तंपुन-३९२३/प्र.क्र.६७/२३/तांशि-३, दि.२८/०३/२०२३ सोबतचे प्रपत्र "अ".**

**मागणी क्र.डब्ल्यु -३- मुख्य लेखाशिर्ष- २२०३, सन २०२२-२३ मधील पुनर्विनियोजन दर्शविणारे विवरणपत्र.**

**(रुपये हजारात)**

| अ क्र | गौणशिर्ष/ उपलेखाशिर्ष | पुनर्विनियोजन करेपर्यंत माहित असलेला प्रत्यक्ष खर्च | उद्दिष्टे | सन २०२२-२३ करीता मंजूर तरतूद | पुनर्विनियोजीत करावयाची रक्कम | प्रत्यार्पित करावयाची रक्कम | पुनर्विनियोजना नंतर होणारे अंतिम अनुदान | (+) पुनर्विनियोजन/(-) बचत तपशिलवार कारणे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तंत्रशिक्षण संचालनालयाचे बळकटीकरण करणे-२२०३ ००३१ | ०,०० | ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | ७०,०० | (-)१४,०० | -- | ५६,०० | चालू वर्षी सदर योजनेंतर्गत रु.५६.०० लक्ष इतक्या रकमेच्या खरेदीच्या प्रस्तावांस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर खरेदीची प्रक्रिया अंतिम टप्प्यात असुन हा निधी मार्च, २०२३ अखेर खर्च होणार आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत रु.१४.०० लक्ष इतक्या निधीची बचत होत आहे. |
| २ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे-२२०३ ०५३२ | १,२०,०० | ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १,४०,०० | (-)२०,०० | -- | १,२०,०० | चालू वर्षी सदर योजनेंतर्गत विद्यापीठाच्या बांधकामासाठी रु.१२०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला असुन, मार्च, २०२३ अखेर तितकाच निधी खर्च होणार आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत रु.२०.०० लक्ष इतक्या निधीची बचत होत आहे. |
| ३ | अभियांत्रिकी महाविद्यालये (कार्यक्रम), २२०३ ०१९४ | २४,००,०० | ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २८,००,०० | (-)६७,०० | -- | २७,३३,०० | चालू वर्षी सदर योजनेंतर्गत संस्थांच्या मागणीप्रमाणे रु.२४००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे व रु.३३२.६१ लक्ष इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव नियोजन विभागामार्फत वित्त विभागास सादर करण्यात आलेला आहे. त्यानुसार एकूण रु.२७३२.६१ लक्ष इतका निधी मार्च, २०२३ अखेर खर्च होणार आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत रु.६७.०० लक्ष इतक्या निधीची बचत होत आहे. |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करणे-२२०३ ३५५१ | १२,००,०० | ३४, शिष्यवृत्ती/ विद्यावेतने | १४,२५,०० | (-)१,५५,०० | -- | १२,७०,०० | चालू वर्षी सदर योजनेंतर्गत शिष्यवृत्ती मंजूर झालेल्या विद्यार्थ्यांसाठी रु.१२००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे व रु.७०.०० लक्ष इतका निधी मार्च, २०२३ अखरे खर्च होणार आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत रु.१५५.०० लक्ष इतक्या निधीची बचत होत आहे. |
| ५ | शासकीय तंत्रनिकेतनांचा विस्तार व विकास (कार्यक्रम)- २२०३ ०२११ | ८२,९७ | ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | १९,२५,०० | (-)४,१५,०० | -- | १५,१०,,०० | चालू वर्षी सदर योजनेंतर्गत रु.१७६०.३६ लक्ष इतक्या रकमेच्या खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे व त्यापैकी रु.१५१०.०० लक्ष रकमेच्या प्रस्तावांना वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर खरेदीची प्रक्रिया अंतिम टप्प्यात असुन रु.१५१०.०० लक्ष इतका निधी मार्च, २०२३ अखेर खर्च होणार आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत रु.४१५.०० लक्ष इतक्या निधीची बचत होत आहे. |
| ६ | भारतीय माहिती व तंत्रज्ञान संस्थेची स्थापना करणे-२२०३ २७३१ | ०,०० | ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ५,६०,०० | (-)१,६८,०० | -- | ३,९२,०० | चालू वर्षी सदर योजनेंतर्गत रु.२८०.०० लक्ष इतका निधी नुकताच वितरीत करण्यात आलेला आहे व रु.११२.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव सादर करण्यात येत आहे. त्यानुसार एकूण रु.३९२.०० लक्ष इतका निधी मार्च, २०२३ अखेर खर्च होणार आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत रु.१६८.०० लक्ष इतक्या निधीची बचत होत आहे. |
| ७ | डॉ.पजाबराव देशमुख वसतीगृह निर्वाह भत्ता योजना-२२०३ ३५४२ | ७६,००,०० | ३४, शिष्यवृत्ती/ विद्यावेतने | ९५,९४,७९ | (+)८,३९,०० | -- | १,०४,३३,७९ | डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजनेंतर्गत पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांना शैक्षणिक वर्ष २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ मधील प्रलंबित निर्वाह भत्त्याची रक्कम अदा करण्यासाठी ज्यादा निधीची आवश्यकता असल्यामुळे पुनर्विनियोजना- व्दारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे. |